**अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती) यांचे स्टाफ ऑफिसर या अस्थायी पदास मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-३६१८/प्र.क्र.०९/ पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२४.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-०१/२००१/प्र.क्र.४३/पोल-१अ, दि.११.०५.२००१.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-१३०८/प्र.क्र.२२८/पोल-१अ, दि. २२.१०.२००९.
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-१७१६/प्र.क्र.१९७ (१)/पोल-१अ, दि. ०७.०६.२०१६.
४) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.०९/पोल-३, दि.२१.०९.२०२०.
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.०९/पोल-३, दि.२६.०३.२०२१.
६) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.०९/पोल-३, दि.३०.०९.२०२१.
७) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.०९/पोल-३, दि.२३.०३.२०२२.
८) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.०९/पोल-३, दि.१३.०९.२०२२.
९) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.०९/पोल-३, दि.०२.०३.२०२३.
१०) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.०९/पोल-३, दि.२१.०९.२०२३
११) पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/पोअ-वि.कृ./ मुदतवाढ/ ३७/ २०१७, दि.२७.०२.२०२४.
१२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४.

**शासन निर्णय:-**

राज्य पोलीस दलाच्या पुनर्रचनेअंतर्गत उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ येथे नमूद दिनांक ११.०५.२००१ च्या शासन निर्णयाव्दारे पोलीस अधीक्षक/पोलीस उपआयुक्त या संवर्गात ३० पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद ३० पदांपैकी अ.क्र.१३ ते १९ येथे नमूद अतिरिक्त समादेशक, राज्य राखीव पोलीस बल या ७ पदांचे उपरोक्त संदर्भाधिन क्र.२ येथे नमूद दिनांक २२.१०.२००९ च्या शासन निर्णयाव्दारे फेरवाटप करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर फेरवाटप केलेल्या ७ पदांपैकी अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती) यांचे स्टाफ ऑफिसर या

अस्थायी पदास उपरोक्त संदर्भाधिन क्र.१० येथे नमूद दिनांक २१.०९.२०२३ च्या शासन निर्णयाव्दारे दिनांक ०१.०९.२०२३ ते दिनांक २९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधिन क्र.११ येथे नमूद दिनांक २७.०२.२०२४ च्या पत्राव्दारे अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती) यांचे स्टाफ ऑफिसर या अस्थायी पदास दिनांक ०१.०३.२०२४ पासून पुढील मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

२. उक्त पद ज्या परिस्थितीत निर्माण करण्यात आले होते ती परिस्थिती अद्यापही कायम आहे. म्हणून, उक्त अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती) यांचे स्टाफ ऑफिसर या अस्थायी पदास **दिनांक ०१ मार्च, २०२४ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२४ पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

३. सदरचा खर्च “२०५५-पोलीस, ००१संचालन व प्रशासन, (००)(०१)पोलीस निरीक्षणालये” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४ व्दारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१७२५३२९९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2024.03.14 17:35:10 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**सह सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, विशेष कृती दल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.

४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
७. गृह विभाग, कार्यासन (पोल-१अ).
८. वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
९. निवड नस्ती (पोल-३).